**महिंद लघु पाटबंधारे योजना, ता.पाटण, जि.सातारा, या योजनेस द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा १०१२/(९३/२०१२)/ ल.पा.१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १३ जून, २०१८

<u>संदर्भ</u>:-

**१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचा निर्णय क्र.(२९६)(३९१/१९९६)/ महिंद/लपा-२ दिनांक १६/०९/२०१८**

**२) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे जा.क्र.मकृखोविमं/२११/(२४४/२०११) /प्रशा-५/३९०२, दि.१५/०५/२०१५ चे पत्र.**

**३) वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-३२ यांचे पत्र क्र.व्यअस- २०१८/प्र.क्र.२७/अर्थसं-२, दिनांक २७ फेब्रुवारी,२०१७**

<u>प्रस्तावना</u>:-

महिंद लघु पाटबंधारे योजना ता.पाटण जि.सातारा या योजनेस संदर्भ क्र.१ अन्वये एकूण रु.३५४.५२ लक्ष इतक्या किंमतीस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यांत आली होती. सदर प्रथम सुधारित प्रशासकिय मान्यता प्रस्ताव १९९५-१९९६ च्या दरसुचीवर आधारित होता.प्रकल्पाचे काम सुरु असतांना दरसूचीतील वाढ,भूसंपादन किंमतीतील वाढ,संकल्पचित्र बदलामुळे वाढ, अपुरी तरतूद,इतर कारणांमुळे व अनुषंगिक खर्चातील वाढीमुळे सन २००९-२०१० ची दरसुची वापरुन सुधारित अंदाजपत्रक तयार करुन रु.११५५.३७ लक्ष इतक्या किंमतीस द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांच्या संदर्भ क्र.२ चे पत्रान्वये शासनास सादर केला होता. व्यय अग्रक्रम समितीच्या दि. १५ फेब्रुवारी,२०१८ रोजी झालेल्या बैठकीत सदर द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मान्य करण्यात आला आहे. त्यानुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय**

१) महिंद लघु पाटबंधारे योजना, ता.पाटण जि.सातारा या योजनेस सन २००९-२०१० ची दरसूचीवर आधारित कामाच्या अंदाजित रु. ११५५.३७ लक्ष (रुपये अकरा कोटी पंचावन्न लक्ष सदोतीस हजार फक्त) या किंमतीस द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. (कामासाठी रु.१०९०.१३ लक्ष व अनुषंगिक खर्चासाठी रु.६५.२४ लक्ष). अंदाजित किंमतीचा गोषवारा सोबत जोडलेल्या परिशिष्ट "अ" येथे देण्यात आला आहे.

सदर द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१.१ सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वयी करण्याच्या विविध टप्यावर झालेल्या अनियमिततेस मान्यता गृहित धरता येणार नाही.

१.२ या योजनेबाबत चालू असलेल्या अथवा प्रस्तावित विभागीय चौकशीची कार्यवाही पूढे चालू ठेवावी.सदर सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहचणार नाही.

१.३ सदर योजनेसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. या संदर्भात प्रचलित शासन निर्णय, CWC ची मार्गदर्शक तत्वे, वित्त अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपद्धती याची काटेकोरपणे अंबलबजावणी करण्यात यावी.

२) या योजनेच्या कामावरील खर्च मुख्य लेखाशिर्ष मागणी आय ५ "४७०२, लहान पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च १९०,सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (००) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर क्षेत्रातील गुंतवणूका,(००)(०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (ल.पा.) (उर्वरित महाराष्ट्र) (४७०२ ४७९४) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाच्या मंजूर अनुदानातुन भागविण्यांत यावा.निधीची मंजूरी मिळाल्याशिवाय या योजनेच्या कामावर कोणत्याही कामाचा खर्च करू नये.

३) हा शासन निर्णय,नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१४८/का.१४३४ दि. ११/०८/२०१७ आणि वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२१८/व्यय १२ दि.१३/०९/२०१७ अन्वये तसेच व्यय अग्रक्रम समीतीने दि. १५ फेब्रुवारी,२०१८ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत दिलेल्या मंजूरीनुसार व संदर्भ क्रं २ नुसार याबाबतच्या निर्गमीत केलेल्या इतिवृत्तानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

४) या योजनेस प्रदान केलेली द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता लपा कार्यासनाच्या प्रशासकीय मान्यता नोंदवहीतील अ.क्र.१७७ वर नोंदविण्यांत आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१३१७०६१९२१२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dharane Mallikarjun Irappa

Digitally signed by Dharane Mallikarjun Irappa
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42153c779eba7d6ca17364b6d37857b105b20a01d36c767c7ed1d7d278837bd7, cn=Dharane Mallikarjun Irappa
Date: 2018.06.13 17:09:32 +05'30'

**( म.ई.धरणे )**

**उपसचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अंदाजित किंमतीच्या गोषवाऱ्यासह :-
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
३. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपुर.
४. वित्त विभाग (व्यय-१२)मंत्रालय, मुंबई ३२
५. नियोजन जिभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई ३२.

६. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
७. मुख्य अभियंता(वि.प्र.), जलसंपदा विभाग, पुणे.
८. आंतर वित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. जिल्हाधिकारी पुणे, पुणे
१०.अधीक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा.
११.कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग,सातारा
१२.उपसचिव (लपा)/ अवरसचिव(लपा) /उपअभियंता(लपा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.कार्यासन अर्थ १-२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क, महासंचालक, मंत्रालय, मुंबई.
१५.लपा संग्रहार्थ

## परिशिष्ट "अ"

शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा १०१२/(९३/२०१२)/ ल.पा.१ दिनांक १३/०६/२०१८ चे सहपत्र
महिंद लपात,ता.पाटण जि.सातारा द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यतेचा
अंदाजित किंमतीचा गोषवारा

| अ.क्र. | उपशिर्ष | किंमत (रु.लक्ष) |
|---|---|---|
| | अ - प्राथमिक कामे | १.५५ |
| | ब - भू संपादन (जमीन) | ४३७.७७ |
| | सी - कामे धरण,सांडवा व चॅनेल | ४३६.०७ |
| | के- इमारती | ० |
| | डी-विमोचक | १०.९२ |
| | को.प.बंधारे | १०६.४१ |
| | ओ-संकीर्ण | १.५२ |
| | एम-वृक्षारोपण | ०.२० |
| | पी-देखभाल | १.०९ |
| | आर-दळणवळण | ९४.६० |
| | अनुषंगिक खर्च | ६५.२४ |
| | **एकूण** | **११५५.३७** |

**ठळक वैशिष्टे**

१. योजनेची सिंचन क्षमता - ३०४ हेक्टर
२. एकूण पाणी साठा - २४०४ स.घ.मी.
३. पाणी साठ्याची प्रती स.घ.मी किंमत - रु.४७५०३ /-स.घ.मी.
४. लाभव्यय गुणोत्तर - १.२८

Dharane
Mallikarjun Irappa

Digitally signed by Dharane Mallikarjun Irappa
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42153c779eba7d6ca17364b6d37857b105b20a01d36c767c7ed1d7d278837bd7, cn=Dharane Mallikarjun Irappa
Date: 2018.06.13 17:09:43 +05'30'

(म.ई.धरणे)
उपसचिव,महाराष्ट्र शासन